**जिल्हा नियंत्रण कक्षाच्या देखभालीसाठी निधी अभिहस्तांकित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र. मातंसं२००९/प्र.क्र.३६/०९/३९
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : २६/०६/२००९

**शासन निर्णय:-**

शासनाने आपत्कालीन व्यवस्थापन यंत्रणेअंतर्गत जलदगतीने माहितीची देवाण घेवाण करण्यासाठी व्हीसॅट यंत्रणेची स्थापना सन १९९८-९९ साली केली आहे. या यंत्रणेअंतर्गत सर्व जिल्हयातील जिल्हाधिकारी कार्यालये, विभागीय आयुक्त कार्यालये, यशदा-पुणे, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र-नागपूर येथे नियंत्रण कक्ष स्थापन करण्यात आले आहेत. मुख्य नियंत्रण कक्ष मंत्रालयात स्थापन करण्यात आले आहे. जिल्हास्तरीय नियंत्रण कक्षात खालील महत्वांच्या बाबींची स्थापना करण्यात आली आहे:-

अ) सर्व्हर, संगणक, व्हीसॅट यंत्रणा, फॅक्स यंत्रणा
ब) वातानुकुलीत यंत्र
क) युपीएस
ड) सिव्हीटी
इ) ई-मेल सुविधेसाठी दूरध्वनी
ई) विद्युत उपकरणे म्हणजे लाईट, पंखा इत्यादी

२. महसुल व वन विभागाने सदर यंत्रणा माहिती तंत्रज्ञान संचालनालयास हस्तांतरीत केल्यानंतर नियंत्रण कक्षाच्या देखभालीसाठी दरवर्षी माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडुन निधी अभिहस्तांकित करण्यात येतो. गतवर्षी प्रतिनियंत्रण कक्षास (रुपये नव्वद हजार फक्त) इतका निधी सर्व विभागीय आयुक्त कार्यालये व जिल्हाधिकारी कार्यालयांना अभिहस्तांकित करण्यात आला होता. त्याचप्रमाणे सन २००८-२००९ या कालावधीत जिल्हा नियंत्रण कक्षास देखभालीसाठी या शासन निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ येथे दर्शविल्याप्रमाणे यशदा- पुणे, जिल्हाधिकारी कार्यालये व विभागीय आयुक्त कार्यालयांना प्रत्येकी रुपये ९०,०००/- (रुपये नव्वद हजार फक्त) प्रमाणे एकूण रुपये ३७,८०,०००/- (सदतीस लाख ऐंशी हजार फक्त) इतका निधी अभिहस्तांकित करण्यात येत आहे. तसेच या शासन निर्णयाच्या परिशिष्ट-अ येथे दर्शविल्याप्रमाणे संबंधित विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी यांना तसेच लेखाधिकारी, यशदा- पुणे यांना अभिहस्तांकित करण्यात आलेल्या रकमेचा प्रत्यक्ष खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयाद्वारे अभिहस्तांकित करण्यात येणाऱ्या निधीचा वापर दूरध्वनी देयके, विद्युत देयके, वातानुकूलीत यंत्रणेची देखभाल, युपीएसच्या बॅटरीसाठी आवश्यक असलेले डीस्टील्ड वॉटर इत्यादी देखभाल स्वरुपाच्या बाबींसाठीच खर्च करण्यात यावा. दरमहा होणा-या खर्चाचे कोषागार प्रमाणक, दिनांकासह दरमहा अहवाल व वर्षअखेर खर्चाच्या विनियोगाचा अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडे पाठविण्यात यावा. सदर निधी प्रत्यक्ष खर्च करताना सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग यांच्या प्रचलित नियम तसेच वित्तीय नियम व विहित तरतुदी यांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. उच्चाधिकार समितीने दि. १८.६.२००२ रोजी घेतलेल्या निर्णयास अनुसरुन नियंत्रण कक्षाच्या देखभालीच्या खर्चात काटकसर करणे आवश्यक आहे. देखभालीच्या खर्चात काटकसर करण्यासाठी पुढील प्रमाणे कार्यवाही करावी.

अ) शासनाची जी कार्यालये नियंत्रण कक्षाशी थेट जोडण्यात आलेली नाहीत अशा कार्यालयांनी ई-मेल सुविधेचा वापर डायल अप द्वारे करावयाचा आहे व या वापरासाठीच नियंत्रण कक्षात दूरध्वनी उपलब्ध करुन देण्यात आले आहे. तेव्हा सदर दूरध्वनी फक्त येणारे कॉल स्वीकारत असल्यामुळे

प्रती दूरध्वनी देयके न्युनत्तम असावीत. नियंत्रण कक्षातील दूरध्वनीचा वापर इतर कार्यालयीन कामासाठी करण्यात येऊ नये.

ब) नियंत्रण कक्षात स्थापन करण्यात आलेल्या वातानुकुलीत यंत्रणेची देखभाल खाजगी कंपनीकडून करुन घेण्यात यावी व त्यासाठी शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करावा.

क) जिल्हा नियंत्रण कक्षासाठी स्वतंत्र विद्युत मिटर असावे.

ड) ई-मेल व पीसी फॅक्स चा वापर वाढविण्यासाठी स्टेशनरी खरेदी करण्यात येऊ नये.

इ) व्ही-सॅट दूरध्वनीचा वापर जास्तीत जास्त करण्यात यावा.

४. सदरहू प्रयोजनावरील होणारा खर्च हा मागणी क्र. ए-४, २०५२, सेक्रेटरीएट सर्वसाधारण सेवा (००)(०९) माहिती तंत्रज्ञान संचालनालय, योजनेत्तर (२०५२ ०४७३) (१७) संगणकावरील खर्च, या लेखा शिर्षाखाली टाकण्यात यावा व तो वित्तीय वर्ष सन २००९-२०१० साठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरचा निधी आहरीत करताना वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-१००६/प्र.क्र.१३१/कोषा प्रशासन-५ दि. १५मे २००७ मधील अर्थसंकल्पीय तरतुदीचे वितरण करण्याबाबतचा व कोषागारातून रकमा काढण्यासंदर्भात सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे व मासिक निधी विवरणपत्रानुसार दरमहा खर्च करण्यात यावा.

५. सदर निधी अभिहस्तांकित होण्यापूर्वी या संचालनालयाकडे योजनेतर २०५२०४७३-(१७) संगणकावरील खर्च या लेखाशिर्षाखाली सन २००९-१० या वित्तीय वर्षासाठी रु.६,६७,३७,०००/- इतके मंजूर अनुदान असून त्यातुन या खर्चासह रु.५२,३६,०९८/- इतका खर्च झाला असून रु. ६,१५,००,९०२/- इतकी शिल्लक आहे.

६. हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र १०००/प्रक्र४६/विनिमय, दि. ११ जुलै २००१ भाग पहिला उपविभाग दोन मधील अनु क्र. २८ब नियम क्र. ७६ नुसार विभाग प्रमुखांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक क्रमांक २००९०६२६१५३०४९००१ असा आहे.**

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.**

**( डॉ. संतोष. भोगले)**
**अवर सचिव (मातं)**

प्रति,

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१,मुंबई (२ प्रती)
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर (२ प्रती)
३) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई (२ प्रती)
४) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर (२ प्रती)
५) सर्व विभागीय आयुक्त
६) सर्व जिल्हाधिकारी,
७) सर्व जिल्हाकोषागारे
८) यशदा - पुणे
९) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
११) कक्ष अधिकारी , साप्रवि कार्यासन - २५
१२) रोख शाखा (मातंसं-३९)
१३) निवड नस्ती, कार्यासन - ३९

30/6/09

**शासन निर्णय क्र. मातंसं२००९/प्र.क्र.३६/०९/३९, दि. २६/०६/२००९चे परिशिष्ट - अ**

**(रु. लाखात)**

| अनु. क्र. | निधी अभिहस्तांकित करण्यात येणाऱ्या कार्यालयाचे नांव | आहरण व संवितरण अधिकारी | या शासन निर्णयाद्वारे अभिहस्तांकीत करण्यात येणारा निधी |
|---|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी कार्यालय, ठाणे | जिल्हाधिकारी, ठाणे | ०.९ |
| २ | जिल्हाधिकारी कार्यालय, रायगड | जिल्हाधिकारी, रायगड | ०.९ |
| ३ | जिल्हाधिकारी कार्यालय, रत्नागिरी | जिल्हाधिकारी, रत्नागिरी | ०.९ |
| ४ | जिल्हाधिकारी कार्यालय, सिंधुदुर्ग | जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग | ०.९ |
| ५ | जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे | जिल्हाधिकारी, पुणे | ०.९ |
| ६ | जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर | जिल्हाधिकारी, सोलापूर | ०.९ |
| ७ | जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली | जिल्हाधिकारी, सांगली | ०.९ |
| ८ | जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा | जिल्हाधिकारी, सातारा | ०.९ |
| ९ | जिल्हाधिकारी कार्यालय, कोल्हापूर | जिल्हाधिकारी, कोल्हापूर | ०.९ |
| १० | जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक | जिल्हाधिकारी, नाशिक | ०.९ |
| ११ | जिल्हाधिकारी कार्यालय, अहमदनगर | जिल्हाधिकारी, अहमदनगर | ०.९ |
| १२ | जिल्हाधिकारी कार्यालय, जळगाव | जिल्हाधिकारी, जळगाव | ०.९ |
| १३ | जिल्हाधिकारी कार्यालय, धुळे | जिल्हाधिकारी, धुळे | ०.९ |
| १४ | जिल्हाधिकारी कार्यालय, नंदूरबार | जिल्हाधिकारी, नंदूरबार | ०.९ |
| १५ | जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर | जिल्हाधिकारी, नागपूर | ०.९ |
| १६ | जिल्हाधिकारी कार्यालय, भंडारा | जिल्हाधिकारी, भंडारा | ०.९ |
| १७ | जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर | जिल्हाधिकारी, चंद्रपूर | ०.९ |
| १८ | जिल्हाधिकारी कार्यालय, वर्धा | जिल्हाधिकारी, वर्धा | ०.९ |
| १९ | जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली | जिल्हाधिकारी, गडचिरोली | ०.९ |
| २० | जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती | जिल्हाधिकारी, अमरावती | ०.९ |
| २१ | जिल्हाधिकारी कार्यालय, अकोला | जिल्हाधिकारी, अकोला | ०.९ |
| २२ | जिल्हाधिकारी कार्यालय, बुलढाणा | जिल्हाधिकारी, बुलढाणा | ०.९ |
| २३ | जिल्हाधिकारी कार्यालय, यवतमाळ | जिल्हाधिकारी, यवतमाळ | ०.९ |
| २४ | जिल्हाधिकारी कार्यालय, औरंगाबाद | जिल्हाधिकारी, औरंगाबाद | ०.९ |
| २५ | जिल्हाधिकारी कार्यालय, जालना | जिल्हाधिकारी, जालना | ०.९ |
| २६ | जिल्हाधिकारी कार्यालय, परभणी | जिल्हाधिकारी, परभणी | ०.९ |
| २७ | जिल्हाधिकारी कार्यालय, बीड | जिल्हाधिकारी, बीड | ०.९ |
| २८ | जिल्हाधिकारी कार्यालय, नांदेड | जिल्हाधिकारी, नांदेड | ०.९ |
| २९ | जिल्हाधिकारी कार्यालय, उस्मानाबाद | जिल्हाधिकारी, उस्मानाबाद | ०.९ |
| ३० | जिल्हाधिकारी कार्यालय, लातूर | जिल्हाधिकारी, लातूर | ०.९ |
| ३१ | जिल्हाधिकारी कार्यालय, हिंगोली | जिल्हाधिकारी, हिंगोली | ०.९ |
| ३२ | जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम | जिल्हाधिकारी, वाशिम | ०.९ |
| ३३ | जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदिया | जिल्हाधिकारी, गोंदिया | ०.९ |
| ३४ | जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर | जिल्हाधिकारी, मुंबई शहर | ०.९ |
| ३५ | जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई उपनगर | जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर | ०.९ |
| ३६ | कोकण विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण भवन, मुंबई | विभागीय आयुक्त, कोकण भवन, मुंबई | ०.९ |
| ३७ | पुणे विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे | विभागीय आयुक्त, पुणे | ०.९ |
| ३८ | नाशिक, विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक | विभागीयआयुक्त, नाशिक | ०.९ |
| ३९ | नागपूर विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर | विभागीय आयुक्त, नागपूर | ०.९ |
| ४० | औरंगाबाद विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | ०.९ |
| ४१ | अमरावती विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती | विभागीय आयुक्त, अमरावती | ०.९ |
| ४२ | यशदा - पुणे | लेखाधिकारी, यशदा- पुणे | ०.९ |
| | | **एकुण** | **३७.८०** |
| | | **( रुपये सदतीस लाख ऐंशी हजार फक्त)** | |

( डॉ. संतोष. भोगले)
अवर सचिव (मातं)

**जिल्हा नियंत्रण कक्षाच्या देखभालीसाठी निधी अभिहस्तांकित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र. मातंसं२००९/प्र.क्र.३६/०९/३९
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : ०३/०७/२००९

**शुध्दीपत्रक**

**वाचाः- शासन निर्णय क्र. मातंसं२००९/प्र.क्र.३६/०९/३९ दि. २६/०६/२००९.**

**शासन निर्णयः-**

उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयान्वये जिल्हास्तरीय नियंत्रण कक्षाच्या देखभाली प्रीत्यर्थ सन २००९-१० या कालावधीसाठी रु. ९०,०००/- (रुपये नव्वद हजार फक्त) इतका निधी अभिहस्तांकित करण्यात आला. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ मधील " त्याचप्रमाणे सन २००८-२००९ या कालावधीत जिल्हा नियंत्रण कक्षास देखभालीसाठी या शासन निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ येथे दर्शविल्याप्रमाणे यशदा- पुणे, जिल्हाधिकारी कार्यालये व विभागीय आयुक्त कार्यालयांना प्रत्येकी रुपये ९०,०००/- (रुपये नव्वद हजार फक्त) प्रमाणे एकूण रुपये ३७,८०,०००/- (सदतीस लाख ऐंशी हजार फक्त) इतका निधी अभिहस्तांकित करण्यात येत आहे." **ह्या तपशीलाऐवजी**

" त्याचप्रमाणे सन २००९-२०१० या कालावधीत जिल्हा नियंत्रण कक्षास देखभालीसाठी उपरोक्त संदर्भित शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ येथे दर्शविल्याप्रमाणे यशदा- पुणे, जिल्हाधिकारी कार्यालये व विभागीय आयुक्त कार्यालयांना प्रत्येकी रुपये ९०,०००/- (रुपये नव्वद हजार फक्त) प्रमाणे एकुण रुपये ३७,८०,०००/- (सदतीस लाख ऐंशी हजार फक्त) इतका निधी अभिहस्तांकित करण्यात येत आहे." **असा वाचावा.**

**सदर शासन निर्णय उपरोक्त संदर्भित शासन निर्णया ( संगणक क्रमांक २००९०६२६१५३०४९००१) सोबत महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे.**

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.**

**( डॉ. संतोष. भोगले)**
**अवर सचिव (मातं)**

प्रति,
१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१,मुंबई (२ प्रती)
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर (२ प्रती)
३) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई (२ प्रती)
४) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर (२ प्रती)
५) सर्व विभागीय आयुक्त
६) सर्व जिल्हाधिकारी,
७) सर्व जिल्हाकोषागारे
८) यशदा - पुणे
९) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
११) कक्ष अधिकारी , साप्रवि कार्यासन - २५
१२) रोख शाखा (मातंसं-३९)
१३) निवड नस्ती, कार्यासन - ३९